मागणी क्रमांक झेड एच-५, लेखाशिर्ष ४७०२ ए ०२८.
साठवण तलाव जानोरी, ता. कांरजा जि. वाशिम
(भूसंपादन निधी)

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : भूसंपा-२०२५/प्र.क्र. १४९/जल-०४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २८ मार्च, २०२५.

**वाचा**:
१) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. संकिर्ण-०३/२०१५/प्र.क्र. ३४/अ-२, दिनांक मे,२०१५ व ३० सप्टेंबर, २०१५.
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. संकिर्ण-०८/२०१५/प्र.क्र.१०३/अ-२, दिनांक ३० मार्च,२०१६.
३) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग, क्र. एलक्यूएन-०१/ २०१७/ प्र.क्र. १२ / अ-२, दिनांक २५ जानेवारी, २०१७.
४) मृद व जलसंधारण विभाग,शासन निर्णय क्र.भूसंपा-२०२४/प्र.क्र.०९/जल-४, दिनांक: ३० जानेवारी, २०१४.
५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४ /प्र.क्र.८० /अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४.
७) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती यांचे पत्र क्र. असंलि /४४०३/२०२४, दिनांक २६ नोव्हेंबर, २०२४.

**प्रस्तावना:** राज्य एकत्रित निधीच्या लेखाशिर्ष संकेतांक क्रमांक ४७०२ A०२८ खाली मंजुर असलेला साठवण तलाव जानोरी ता. कारंजा जि. वाशिम या योजनेकरिता संपादीत (भू.प्र.क्र. ०५/४७/२०१८-१९) केलेली जमीन खाजगी वाटाघाटीद्वारे थेट सरळ खरेदी पध्दतीने खरेदी करण्यासाठी संदर्भिय दिनांक २६ नोव्हेंबर, २०२४ अन्वये उर्वरित रक्कमेची मागणी करण्यात आली आहे. त्यानुषंगाने सदरची जमीन खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी करण्यासाठी शिफारस करण्यात आलेल्या संदर्भिय क्र. ७ च्या प्रस्तावावर वित्त विभाग तसेच महसूल व वन विभागाचे संदर्भीय शासन निर्णय/ परिपत्रकामधील सूचना विचारात घेवून खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**निर्णय** : साठवण तलाव जानोरी ता. कारंजा जि. वाशिम या योजनेकरिता संपादित केलेली जमीन खाजगी वाटाघाटीद्वारे थेट सरळ खरेदी पध्दतीने खरेदी करण्यासाठी मागणी विवरणपत्रानुसार उर्वरित रक्कम रुपये ७,९५,५२०/- (अक्षरी रुपये सात लक्ष पंच्याण्णव हजार पाचशे वीस फक्त) निधी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरित करण्यात येत आहे.

**अ)** या प्रकरणी महसूल व वन विभागाच्या दिनांक १२ मे,२०१५, ३० सप्टेंबर, २०१५ व २५ जानेवारी, २०१७ च्या शासन निर्णय / परिपत्रकानुसार तसेच अशा प्रकरणी शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले परिपत्रक / शासन निर्णयान्वये दिलेल्या निदेशानुसार कार्यवाही करावी.

**ब)** या प्रकरणातील थेट खरेदी पध्दतीने जमीन खरेदी करण्याची कार्यवाही विहीत नियमानुसार तात्काळ करण्यात यावी. सदर खरेदी प्रक्रियेची संपूर्ण जबाबदारी संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, वाशिम यांची राहील. त्यांनी याबाबतचा अहवाल विहित मार्गाने शासनास सादर करावा.

**क)** या प्रकल्पाच्या भूसंपादनाकरिता अन्य स्त्रोतांकडून निधी उपलब्ध झाला असल्यास याद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या रक्कमांचे आहरण अथवा वितरण करण्यात येवू नये.

**ड)** तसेच भूसंपादन प्रयोजनार्थ वरिलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या निधीची गरज नसल्यास, हा निधी कोणत्याही परिस्थितीत परस्पर अन्य प्रयोजनार्थ वितरित करण्यात येवू नये, सदर निधी तातडीने शासनाकडे प्रत्यार्पीत करावा.

**इ)** कोणत्याही लाभार्थ्यास दुहेरी फायदा होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

२. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

३. यावर होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक झेड एच-५,
४७०२- लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च,
००
१०१, भूपृष्ठ जल
(०१) लहान पाटबंधारे,
(०१)(०२)लहान पाटबंधारे योजना,१०१ ते २५० हे.सि.क्षमता(कार्यक्रम) (४७०२ ए ०२८),
५३, मोठी बांधकामे

४. वरील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतिस्वाक्षरित प्रती अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपूर आणि शासनास सादर कराव्यात.

५. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती यांची राहील व अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपूर हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

६. प्रस्तुत आदेश, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३६८/२४/१४३४, दिनांक १२/१२/२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १६/२०२५/ व्यय-१५, दिनांक १०/०१/२०२५ च्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०३२८१७०९४७४९२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार वा नांवाने.

RAJESH
HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.28 17:10:25 +05'30'

**( रा. हे. बागडे )**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१) अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपूर.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती.
३) उप विभागीय अधिकारी तथा भूसंपादन अधिकारी, कारंजा जि. वाशिम.
४) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, वाशिम.
५) महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
७) कक्ष अधिकारी (जल-११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८) निवड नस्ती, कार्यासन (जल-४)

**प्रत अग्रेषित,**

१. मा. विरोधी पक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
४. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फत संबंधीत लघु सिंचन (जलसंधारण) उपविभागीय अभियंता)
५. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांचे स्वीय सहायक)
६. आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर.